राज्यस्तरीय विक्रीकर तडजोड
मंडळ:- तज्ञांची समिती.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक:-विकक-१९९८[२२]/कराधान-१.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २४ जुलै, १९९८.

शासन निर्णय

मुंबई विक्रीकर अधिनियम १९५९ खाली एक तडजोड मंडळ स्थापन करण्याचे अधिकार शासनाला १९९५ सालापासून उपलब्ध आहेत, परंतु वेगवेगळया कारणांमुळे मंडळाची स्थापना आतापर्यंत झालेली नाही. या प्रकारचे तडजोड मंडळ स्थापन करावे काय, महसूल नियमितपणे व लवकर मिळण्याच्या दृष्टीने मंडळाची उपयोग्यता कितपत असेल तसेच शासनाच्या महसूल विषयक धोरणाशी अशा मंडळाची कार्यपध्दती कितपत सुसंगत असेल हे सर्व प्रश्न विचारात घेणे आवश्यक आहे.

या सर्व मुद्यांचा विचार करुन मा. वित्त मंत्री यांना २३ मार्च ९८ रोजी अर्थसंकल्प, विधान सभेला सादर करतांना अशी घोषणा केली होती की, तडजोड मंडळाशी संबंधित सर्व मुद्यांचा अभ्यास करण्यासाठी एक तज्ञांची समिती नेमली जाईल. समितीचा अहवाल मिळाल्यानंतर या विषयावर अंतिम निर्णय घेतला जाईल या अनुरोधाने शासन असा आदेश देत आहे की, खाली नमूद केल्याप्रमाणें अध्यक्ष आणि सदस्य असलेल्या तज्ञांच्या समितीची नियुक्ती करण्यात यावी.

१. श्री. पी. एम. ए. हकीम, प्रधान सचिव, वस्त्रोद्योग - समितीचे अध्यक्ष
२. श्री. सुबोधकुमार, विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र शासन, मुंबई. ४०० ०१०.
३. श्री. व्ही. एन. श्रीवास्तव, -इंडियन रेव्हेन्यू सर्व्हीस. फोन कार्या. ४९५०२५५
डिपार्टमेंटल रिप्रेझन्टेशन, इनकम टॅक्स, सेटलमेंट कमिशन. फोन घरचा. ३६४४४८७
[अमलबजावणी झोन-ओ]
४. श्री. दि. श्री. दीक्षित, विक्रीकरउपायुक्त - सदस्य सचिव फोन ६४९६०११
५. श्री. वाय. पी. त्रिवेदी, ॲडव्होकेट. फोन कार्या. २८७२५७१
सुप्रिम कोर्ट २३, अटलांटा, नरीमनपॉईंट, मुंबई-४०० ०२१ फोन घरचा ३६३३६००
६. श्री. आर. व्ही. पटेल, ॲडव्होकेट फोन २६६३४२२
१३, फेरी मनोर, रुस्तम सिंधवा मार्ग, फोर्ट, मुंबई-१. फोन २६६२७१२.
७. श्री. जी. एस. जेटली, ॲडव्होकेट. फोन २८७०६३७
शील चेंबर, २ रा मजला, चोपसी पटेल रोड, फोर्ट, मुंबई-१फोन २८७४१५७.

८. श्री. अरुण साठे, अॅडव्होकेट फोन ६४९६०११
५ बी पवनार कासा दुसरा मजला
सर पी.एम्. रोड, मुंबई - २३

९. डॅा. विलास सावजी, अॅडव्होकेट, फोन. ३५०[खामगांव]
सिव्हील लाईन्स, खामगांव-४४४३०३

तज्ञ समितीची कार्यकक्षा:- या शासन निर्णयानुसार नियुक्त केलेल्या तज्ञांच्या समितीने तडजोड मंडळाविषयी पूर्ण विचार करुन शासनाला सल्ला द्यावा अथवा शिफारस करावी. शिफारस करतांना समितीने खालील मुद्यांचा प्रामुख्याने विचार करावा:-

१. पहिला मुद्दा म्हणजे अशा प्रकारच्या तडजोड मंडळाची स्थापना केल्यास शासन महसूल अधिक त्वरेने जमा होऊ शकेल काय ?
२. तडजोड मंडळाच्या क्षेत्रात कोणत्या प्रकारची प्रकरणे येऊ शकतील.
३. तडजोड मंडळाला कोणत्या प्रकारचे अधिकार असावेत व या अधिकारांची व्याप्ती व मर्यादा काय असावी ?
४. तडजोड मंडळ स्थापन करायचे असल्यास त्या दृष्टीने अधिनियमामध्ये कोणत्या प्रकारच्या सुधारणा कराव्या लागतील ?

तज्ञ समितीच्या बैठकी आवश्यकतेनुसार घेतल्या जातील. समितीच्या कार्य कालावधी समितीच्या नियुक्तीपासून ३० दिवसांचा राहील. समितीचा दर्जा हा राज्यस्तरीय समितीचा असेल. अशासकीय सदस्यांचा प्रवासभत्ता व दैनिक भत्ता मुंबई नागरी सेवा नियम खंड २ मधील परिशिष्ट ४२[अ] यातील सेक्शन १ मधील १[१] [बी] च्या तरतुदीनुसार व शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-टीआरए-१४७७/१०३२/सी/एसईआर-५ दिनांक २३.९.१९७७ व क्र.टीआरए-१०८३/१४२६/एसईआर-५ दिनांक १.२.१९९४ च्या आधारे नियमित केला जावा. समितीवरील अशासकीय सदस्यांचा प्रवास भत्त्याच्या देयकाच्या बाबतीत समितीचे सदस्य सचिव व नियंत्रक अधिकारी म्हणून कार्य करतील. समितीचे मुख्यालय मुंबई येथे राहील.

समितीच्या बैठका तसेच अशासकीय सदस्यांचा प्रवास खर्च इत्यादींसाठी उद्भवणारा खर्च "२०४० विक्रीकर -अ-संचालन आणि प्रशासन [१] विक्रीकर आयुक्त या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि चालू अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ अ.गो. देशमुख ]
उप सचिव, वित्त विभाग.

प्रत माहितीसाठी सादर अग्रेषित :-

१. समितीचे सर्व सदस्य [पत्राने]
२. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०० ०१०.
३. सर्व अपर विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई/पुणे/नागपूर विभाग,
४. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
५. अध्यक्ष, महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, मुंबई
६. सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-एक, मुंबई
९. महालेखापाल, महाराष्ट्र-दोन, नागपूर
१०. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
११. अध्यक्ष, विक्रीकर सल्लागार संघटना, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई ४०० ०१०.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,
१३. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. मा. वित्तमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांस माहितीसाठी अग्रेषित.
१६. मा. राज्यमंत्री [वित्त] यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांस माहितीसाठी अग्रेषित.
१७. कार्यासने, कराधान-२, कराधान-३, कराधान-४, प्रशासन-४, प्रशासन-८, सेवा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८. निवड नस्ती, कराधान-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.